पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, बारामती या संस्थेतकरीता सुरक्षारक्षकांची पदे भरणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग

## शासन निर्णय क्रमांकः वैशिवि-२०२३/प्र.क्र.२००/प्रशासन-२

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, लोकमान्य टिळक मार्ग
नविन मंत्रालय, मुंबई-४०० ००१
तारीखः २३ ऑगस्ट २०२४

वाचा :-

१) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्रमांकः एसजीए-१५०६/प्र.क्र.९२/काम-५, दिनांक ०८.११.२००६.
२) शासन अधिसूचना, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांकः एसजीए-२०१४/प्र.क्र.३००(२)/कामगार-५, दिनांक ३०.०७.२०१४.
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम/भाग-२, दि. १७.०४.२०१५.
४) शासन निर्णय , वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, क्रमांक एमईडी-२०१०/प्र.क्र.१८७/२०१२/शिक्षण-१, दिनांक ०३/०१/२०१३.
५) शासन निर्णय, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, क्रमांक एमईडी-२०१३/प्र.क्र.२१२/१३/शिक्षण-१, दिनांक ०५/०७/२०१९
६) शासन निर्णय, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, वैशिवि-२०२३/प्र.क्र.२००/प्रशा-२, दिनांक ०२/०८/२०२३.
७) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय यांचे पत्र क्र. संवैशिवसं/पुहहोशावैमवरुबारामती/सुरक्षासेवा/फ/१३४४३/२०२४, दिनांक ०८/०८/२०२४

प्रस्तावना :-

बारामती येथील १०० विद्यार्थी प्रवेश क्षमतेचे वैद्यकीय महाविद्यालय व ५०० रुग्णखाटांचे रुग्णालय सुरु करण्यास दिनांक ०३/०१/२०१३ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. तसेच, दिनांक ०५/०७/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, बारामती येथे प्रथम वर्षाकरीता १०० विद्यार्थी प्रवेशास परवानगी देण्यात आली आहे. पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर शासकीय वैद्यकीय महाविद्यालय परिसरामध्ये विद्यार्थी, प्राध्यापक व अन्य शासकीय कर्मचा-यांच्या सुरक्षततेसाठी संदर्भ क्र. ६ वरील दिनांक ०२/०८/२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये पुणे जिल्हा सुरक्षा रक्षक महामंडळ यांचेकडून ८० सुरक्षारक्षकांची सेवा घेण्यास शासन मान्यता देण्यात आली होती. सदर मान्यतेच्या अनुषंगाने पुणे जिल्हा सुरक्षा रक्षक महामंडळाकडून केवळ ३० सुरक्षारक्षकांची सेवा संस्थेला उपलब्ध झाली आहे. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय यांनी दिनांक ०८/०८/२०२४ रोजीच्या पत्रान्वये उक्त संस्थेला उर्वरित आवश्यक ५० सुरक्षारक्षकांची सेवा महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळ (मेस्को) यांच्याकडून उपलब्ध करुन घेण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला होता. त्यानुषंगाने, पुण्यश्लोक

अहिल्यादेवी होळकर शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, बारामती या संस्थेतकरीता ५० सुरक्षारक्षकांची सेवा  महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळ (मेस्को) यांच्याकडून उपलब्ध करुन घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय: -**

पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर शासकीय वैद्यकीय महाविद्यालय परिसरामध्ये विद्यार्थी, प्राध्यापक व अन्य शासकीय कर्मचा-यांच्या सुरक्षेच्यादृष्टीने ५० सुरक्षा रक्षक (विविध अधिकारी/कर्मचारी) महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळ (मेस्को) यांच्याकडून उपलब्ध करुन घेण्यास व त्याकरीता येणा-या १,९४,५१,८३२/- (जी.एस.टी. सह) (अक्षरी रुपये एक कोटी चौ-यान्नव लाख एकावन्न हजार आठशे बत्तीस फक्त) इतक्या वार्षिक खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय दिनांक १७.०४.२०१५, वित्तीय अधिकार नियम भाग पहिला, उप विभाग -४, अ.क्र. ११ अन्वये प्रशासनिक विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर सुरक्षासेवा उपलब्ध करुन घेण्यासाठी येणारा खर्च संबंधित संस्थेच्या (१०) कंत्राटी सेवा या उद्दिष्टांतर्गत उपलब्ध अर्थसंकल्पीत निधी मधून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक  २०२४०८२३११४६४०४२१३  असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHADEO GIRDHARI JOGDAND

Digitally signed by MAHADEO GIRDHARI JOGDAND
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=0477d837dc0b00fc2cbd45d17d07c625c3417378f97d493a8a277faa29f65459, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C1D08CFDEE92DA209D709F5456D9EDE95236B8A8E7E2A2801B8FED03DCF793D3, cn=MAHADEO GIRDHARI JOGDAND
Date: 2024.08.23 14:39:07 +05'30'

**(म. गि. जोगदंड)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)१/२, महाराष्ट्र, मुंबई.
२. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.
३. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
६. संचालक, महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळ मर्या, पुणे.
७. अधिष्ठाता, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, बारामती.
८. निवडनस्ती (प्रशा-२)